पोलीस प्रशिक्षण विद्यालय, मरोळ यांचे विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचेतील कामाच्या वाटपाबाबत.

---

महाराष्ट्र शासन,

गृह विभाग,

शासन निर्णय गृ. वि. क्र. टीईएक्स ०३९३/सीआर-५९३/पोल-५अ,

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक- ३१ जानेवारी ९५.

वाचा- १] विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अशापत्र क्र. टीआरजी १/१४/२६/प्रशिक्षण/दिनांक २७. ८. ९३.

२] शासन पत्र समक्रमांक- दिनांक १८. ६. ९४.

३] विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. प्रशिक्षण ३/५ [२] मरोळ दिनांक २०. ९. ९४.

शासन निर्णय:- राज्यातील सर्व प्रशिक्षण शाळेतून देण्यात येत असलेले प्रशिक्षणात समानता आणण्याच्या दृष्टीने पोलीस प्रशिक्षण विद्यालय मरोळ हे विशेष पोलीस महानिरीक्षक प्रशिक्षण व खास पथके मुंबई यांचे पर्यवेक्षण व नियंत्रणाखाली ठेवणेबाबत शासनाने निर्णय घेतला असून विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या मधील कामाचे वाटप खालीलप्रमाणे राहील.

१] पोलीस प्रशिक्षण विद्यालय, मरोळचे पर्यवेक्षण व नियंत्रण संपूर्णत: विशेष पोलीस महानिरीक्षक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई व पोलीस महासंचालक यांच्या अधिपत्याखाली ठेवण्यात यावे असे केल्यावर वार्षिक अंदाजपत्रक, प्रशासन, शिस्तभंग विषयक कारवाई इत्यादी बाबी आपोआपच विशेष पोलीस महानिरीक्षक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई व पोलीस महासंचालक यांचेकडे वर्ग होतील.

२] पोलीस प्रशिक्षण विद्यालय, मरोळचे पर्यवेक्षण व नियंत्रण संपूर्णत: विशेष पोलीस महानिरीक्षक प्रशिक्षण व खास पथके, मुंबई व पोलीस महासंचालक यांचे अधिपत्याखाली वर्ग केल्यावर तेथे नियुक्त करावयाच्या अधिका-यांच्या नेमणूका पोलीस महासंचालक करतील. तथापि तेथे नियुक्त करावयाचे अधिकारी व कर्मचारी बृहन्मुंबई पोलीस दलातील असतील. फक्त बाह्य प्रशिक्षणासाठी आवश्यक असलेला कर्मचारी वर्ग विशेष पोलीस महानिरीक्षक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई, बृहन्मुंबई तसेच राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक-८, मुंबई येथून नियुक्त करतील.

३] प्रशिक्षण काळात पर्यवेक्षक व प्रशिक्षक वर्गाचे पोलीस प्रशिक्षणार्थींबरोबर वास्तव्य आवश्यक असते म्हणून राज्यातील इतर पोलीस प्रशिक्षण शाळेच्या अधिकारी व कर्मचारी वर्गास प्रशिक्षण

....२/-

शाळेच्या आवारात निवासस्थाने पुरविण्यात येतात. सध्या पोलीस प्रशिक्षण शाळा, मरोळ येथे नियुक्तीस असलेले फक्त २/३ अधिका-यांना मरोळ येथे निवासस्थाने पुरविण्यात आली आहेत. म्हणून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी पोलीस प्रशिक्षण विदयालय, मरोळ येथे नियुक्त असलेल्या अधिकारी व कर्मचा-यांना मरोळ कॉलनी येथील जास्तीत जास्त निवासस्थाने उपलब्ध करुन दयावीत.

४] सध्या पोलीस प्रशिक्षण विदयालयाकरिता आवश्यक असलेली वाहने पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांचेकडून पुरविली जातात व त्यांची देखभाल देखील बृहन्मुंबई, पोलीस मोटार परिवहन विभागामार्फत केली जाते. ही पध्दती यापुढेही सुरु ठेवण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

२।५।९१

[ र. ग. पवार ]

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,

प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विदयालय, मरोळ, मुंबई,

महालेखाकार, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

निवड नस्ती -पोल -५अ.